**वन महोत्सव २०१७-१८**
**वन महोत्सव कालावधीत करावयाच्या रोपांच्या वाटप व विक्री दराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. साववि - २०१७/प्र.क्र.७४/फ-११,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २५ मे, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २००९/ प्र.क्र.५०/जल -१२ दि. ६ जुलै, २००९
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २०१०/ प्र. क्र.५८/जल -१२,दि. २१ जून, २०१०
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २०१०/प्र.क्र.५८/ जल - १२, दि. २६जुलै, २०१०
४) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २०११/ प्र.क्र.७९/जल -१२, दि. ४ जून २०११
५) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २०१२/प्र.क्र.४०/जल -१२, दि. ५ मे २०१२
६) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २०१३/प्र.क्र. ६२/जल -१२, दि. ३० मे २०१३
७) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २०१४/प्र.क्र.३०/जल - १२, दि. २४ मे २०१४
८) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग एसएलएफ - २०१५/प्र.क्र.३०/जल - १२, दि. ३० मे २०१५
९) प्रधान मुख्य वन संरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे यांचे पत्र जा.क्र. कक्ष-९/राहसे/४५८/ २०१६-१७, दि. २७ मे २०१६
१०) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. वनम -२०१६/प्र.क्र.७१/फ-११,दिनांक: ४ जून, २०१६.

**प्रस्तावना:-**

दि. ५ जून, ते १५ ऑगस्ट, हा काळ वन महोत्सवाचा काळ म्हणून दरवर्षी साजरा केला जातो. या कालावधीत वनीकरणासाठी लोकांना उद्युक्त करण्याच्या दृष्टीने शासनामार्फत सवलतीच्या दराने रोपांचा पुरवठा करण्यात येत असतो. हा लोकांचा कार्यक्रम व्हावा व त्याचबरोबर जनतेला वनीकरणाचे महत्व पटवून द्यावे या दृष्टीने वन महोत्सवाच्या कालावधीत सुधारीत केलेल्या सवलतीच्या दराप्रमाणे रोपांचा पुरवठा करण्यात येतो. तसेच उपरोक्त संदर्भ क्र. (३) येथील दिनांक २६ जुलै, २०१० च्या शासन निर्णयान्वये वन महोत्सवाच्या कालावधीत वाढ करण्यात येवून तो **दि. ५ जून, ते दि. ३१ ऑगस्ट, असा करण्यात आला** आहे. त्यानुसार संदर्भ क्र. (१०) येथील दि. ४ जून, २०१६ च्या शासन निर्णयान्वये सन २०१६-१७ साठी या सुधारित कालावधीनुसार सदर योजना पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात सदर योजना चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१६-१७ या वर्षाचा अनुभव तसेच जनतेचा प्रतिसाद लक्षात घेवून, ही योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात **दिनांक ५ जून, २०१७ ते ३१ ऑगस्ट, २०१७** या वन महोत्सवाच्या कालावधीत चालू ठेवण्यास व प्रभावीपणे राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. वन महोत्सवाच्या कालावधीत सवलतीच्या दराने करावयाचा रोपांचा पुरवठा सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात खालील सवलतीच्या दराने करण्यात यावा. **सदर दर हे वन महोत्सवाच्या कालावधीसाठी निर्धारित केले आहेत.**

| क्र. | प्रजातीचे वर्गीकरण | प्रजातीचे नाव | सन २०१७-१८ साठी मान्य करण्यात आलेले रोप विक्रीचे दर | |
|---|---|---|---|---|
| | | | पॉलिथिन पिशवीतील रोपे (रुपये) | सूटी रोपे (रुपये) |
| १ | २ | ३ | ५ | ६ |
| १ | इंधन, हलके इमारती लाकूड, चारा, सरपणासाठी उपयुक्त प्रजाती | अ) सुबाभूळ, ग्लिरीसिडीया, भेंडी, बाभूळ, खैर, निलगिरी, प्रोसोपिस, महारूख. पांगारा. | ६.०० | ५.५० |
| | | ब) अंजन, निम, सुरु, काशिद,शिरस, बकैन लिंबू, ऑस्ट्रेलियन/ॲकेशिया बाभूळ, करंज,सावर | ६.०० | ५.५० |
| २ | साधारण फळवृक्ष | विलायती चिंच, चिंच, बोर, आवळा, सिताफळ, शेवगा, जांभूळ, हादगा, रायवळआंबा, मोहा, कवठ, बेहडा, हिरडा, वड, उंबर, पिंपळ, बिबा, खिरणी, रामफळ. | ६.०० | ५.५० |
| ३ | मौल्यवान फळवृक्ष | काजू, रातांबा, चारोळी. | १५.०० | ८.०० |
| ४ | व्यापारी, इमारती लाकूड / मौल्यवान प्रजाती | अ) शिवाण, बिजा. | ७.०० | ६.०० |
| | | ब) बांबू | ७.०० | ६.०० |
| | | क) पिशवीतील साग रोपे. | ७.०० | ६.०० |
| ५ | बांधावर लावण्यासाठी प्रजाती | घायपात कंद, खस, गवत, थोंब (२० सें.मी. उंचीचे) | -- | १२.०० प्रति किलो |
| ६ | शोभिवंत वृक्ष | अ) सिल्व्हर ओक, स्पॅथोडिया, गुलमोहर, जॅकरांडा, अमलतास, ॲक्रोकार्पस, इंडियन कॉर्क (बूच), बॉटल ब्रश, चाफा, रेन ट्री, पेल्ट्रोफोरम, कांचन, पारिजात. | ११.०० | ९.०० |
| | | ब) रातराणी, बोगनवेल, क्रोटॉन, डयुरांटा, मोगरा. | ६.०० | -- |
| ७ | फांद्यांपासून वृक्ष लागवड करण्यासाठी डांब (१५० ते २०० सें.मी. उंची, १० ते १२ सें. मी. गोलाई) | वड, भेंडी, पांगारा, शेवगा, चाफा, सांबर, महारुख, पॉपलर, तुती. | १६.०० | -- |
| ८ | इतर मौल्यवान प्रजाती | अ) डुपिंग, अशोक, चंदन. | ३०.०० | -- |
| | | ब) ख्रिसमस ट्री, पिवळा बांबू, थूजा, पाईन्स. | ४५.०० | -- |

( यामध्ये समाविष्ट नसलेल्या प्रजाती "ना नफा, ना तोटा" या तत्वावर विकण्यात येतील तसेच इच्छुकांना सागाची रोपे वन विकास महामंडळामार्फत निश्चित केलेल्या दराने विकली जातील.)

३. वन महोत्सवाच्या कालावधीत (५ जून ते ३१ ऑगस्ट) वन महोत्सवाचे प्रयोजन व महत्व या बाबत प्रभावीपणे सर्वदूर पोहोचणा-या माध्यमातून योग्य प्रसिध्दी देण्यात यावी. तसेच मेळावे व तत्सम कार्यक्रम राबविण्यात यावेत, यासाठी लागणारा खर्च प्रसिध्दीसाठी उपलब्ध असलेल्या निधीतून करण्यात यावा.

४. शाळा/ संस्था यांना रोप पुरवठा करण्याबाबत शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. एसएलएफ-१४९३/प्र.क्र.२२/जल-१४, दि. ६ ऑक्टोबर, १९९७ मधील तरतूदी लागू राहतील. त्यानुसार पिशवीतील रोपांसाठी निर्धारित केलेला दर प्रति रोप रु. ०.५० असा राहील.

५. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी रोपांच्या निर्मितीसाठी आलेला/ येणारा खर्च व त्यांच्या विक्रीतून एकूण जमा झालेला महसूल याबाबतचा चालू आर्थिक वर्षाचा (दि. १ एप्रिल, २०१७ ते ३० सप्टेंबर,२०१७) तपशिल सोबतच्या विहीत नमुन्यात शासनास सादर करावा. अन्य कालावधीत रोपांची विक्री "ना नफा, ना तोटा" या तत्वावर करण्यात यावी.

६. याबाबतचा खर्च "मागणी क्र. सी-७, मुख्य लेखाशीर्ष-२४०६ वनीकरण व वन्यजीवन-१०१-वन संरक्षण व विकास व पुननिर्मित-(११) (३४) (२४०६ ८५५१) (योजनेत्तर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सन २०१७-१८ वर्षाकरीता मंजूर केलेल्या निधीतून भागविण्यात यावा."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५२५१३०३१५२५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.25 13:11:37 +05'30'

**( डी.एल.थोरात )**
**सह सचिव (वने)**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वन संरक्षक, सामाजिक वनिकरण महाराष्ट्र राज्य पुणे.
२) प्रधान मुख्य वन संरक्षक, (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर.
४) मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक) सर्व.
५) वन संरक्षक सामाजिक वनिकरण वृत्त कोकण- ठाणे/ पुणे / नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर.
६) विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनिकरण विभाग (सर्व)
७) उप वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
८) विभागिय वन अधिकारी (प्रादेशिक) सर्व
९) सर्व विभागिय आयुक्त
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद (सर्व)
११) जिल्हा अधिकारी सर्व
१२) सहसंचालक (कृषी), सर्व

१३) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी सर्व
१४) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
१६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१७) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९) कार्यासन अधिकारी, व्यय-०६/अर्थ-१७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०) कार्यासन अधिकारी,ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१) अवर सचिव,फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२२) निवडनस्ती /फ-११.

************

**महसूल व वन विभाग**

**क्र. साववि-२०१७/प्र.क्र.७४/फ-११, दिनांक २५ मे, २०१७ सोबतचे विवरणपत्र**

| अ.क्र. | तयार करण्यात आलेल्या रोपांची संख्या (लाखात) | रोपे तयार करण्यासाठी आलेला खर्च (हजारांत) | एकूण विक्री झालेल्या रोपांची संख्या | विक्रीतून वसूल झालेली रक्कम (रुपये हजारात) | शिल्लक राहिलेल्या रोपांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.25 13:12:40 +05'30'

( डी.एल.थोरात )
सह सचिव (वने)